# ब्रह्मदेशातील एका जुळ्या मुलींचे पुनर्जन्म प्रकरण

डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय ? भाग 13

E Book 178

प्राचार्य अद्वयानंद गळतगे, भोज- ५९१२६३, जि. बेळगाव (कर्नाटक)

भ्र. ९९०२००२५८५




प्राचार्य अद्वयानंद गळतगे, भोजमधील आपल्या फार्महाऊसमधे

# मा खिन् माग्यी आणि मा खिन् मान्गो या जुळ्या मुली

इतर प्रकरणाप्रमाणे हे प्रकरणही ब्रह्मदेशातील पुनर्जन्म संशोधक उ विन माउंग यानी प्रथम तपासले असून स्टिव्हेन्सननी नंतर त्यात भाग घेतला.




Table 2 शान प्रांत

मा खिन् माग्यी आणि मा खिन् मान्गो या जुळ्या मुलींचा जन्म ५ फेब्रुवारी १९६१ रोजी ब्रह्मदेशातील शान प्रांतातील बा हत् म्यो या गावी झाला. त्यांच्या वडिलांचे नाव उ बा थाव् व आईचे नाव दाव म्या तिन्. उ बा थाव् हा बा हत् म्यो या गावातील शिबंदीमध्ये सैनिक होता. त्याची पत्नी दाव म्या तिन् ही चार महिन्याची गरोदर

असताना तिचे मृत वडील उ माउंग माउंग व मृत आई दाव अये ह्ला हे तिच्या (म्हणजे आपल्या मुलीच्या) स्वप्नात येऊन म्हणाले, 'आम्ही तुझ्या पोटी जन्म घेणार आहोत! (एखाद्या स्त्रीने गरोदर होऊन काही महिने लोटल्यानंतर तिच्या पोटी जन्म घेणाऱ्यांनी तिच्या स्वप्नात येऊन तिला आपली ओळख देण्याचे असले प्रकार अन्य काही पुनर्जन्म प्रकरणातही घडले आहेत.) गरोदरपणाच्या सातव्या महिन्यातच तिला प्रसूती वेदना होऊन प्रथम मा खिन् माग्यी जन्मली व नंतर मा खिन् मानगे जन्मली. मा खिन् माग्यीला जन्मतःच डाव्या हाताचा मोठा दोष होता व डाव्या पायालाही एक दोष होता. (छायाचित्रे पाहा. दोन्ही छायाचित्रे तिच्या १२व्या वर्षी घेतलेली आहेत.)







Table 3 मा खिन् माग्यी

मा खिन माग्यीच्या डाव्या हाताला जन्मतःच आंगठ्याखेरीज बाकीची बोटेच नव्हती. बोटे नसलेल्या भागातून पू गळत असे. हा पू गळण्याचा प्रकार दीड महिने चालू होता. नंतर हळुहळू जखमा बऱ्या झाल्या. तसेच डाव्या पायाला जन्मत:च गोल स्वरूपात खोबण होती, हे जुळे दोन भिन्न बीजापासून जन्मल्यांचे (dizygotic)

त्यांच्या रक्त परीक्षेतून दिसून आले. मा खिन् माग्यी ही मुलगी वरील दोन जन्मदोष वगळता धट्टीकट्टी होती व जोमाने वाढली. उलट मा खिन् मानगे ही जन्मतच्च आजारी होती. तिच्यात जन्मतःच क्षयरोगाची लक्षणे दिसून आली. वर सांगितले आहे की दाव म्या तिन् हिच्या स्वप्नात तिच्या आईवडिलांनी येऊन तिच्या पोटी जन्म घेणार असल्याचे सांगितले होते, प्रथम जन्मलेली मा खिन् माग्यी ही तीन वर्षांनी बोलायला शिकल्यानंतर चार ते पाचव्या वय वर्षाच्या दरम्यान म्हणू लागली की आपण दाव म्या तिन्चे (म्हणजे आपल्या आईचे) वडिल उ मांउग माउंग आहे. आपल्या हाताचा बोटे नसलेला जन्मदोष व पायाला खोबणी पडल्याचा जन्मदोष मागच्या जन्मी पक्षाची शिकार केल्यामुळे व प्राण्याशी वाईट रीतीने वागल्यामुळे निर्माण झाले आहेत असे ती म्हणत असे. तिची जुळी धाकटी बहिण मा खिन् मानगे म्हणत असे की "मी दाव म्या तिन्ची (या जन्मातील तिच्या आईची) आई दाव अये ह्ला आहे." मा खिन् माग्यी ही मागच्या जन्मात पुरुष असून त्या जन्मात त्याने हाताने पक्ष्यांची शिकार केल्यामुळे जो तिच्या हाताचा (बोटे नसल्याचा) दोष निर्माण झाला व कोंबड्यांचे पाय दोरीने बांधल्यामुळे जो तिच्या पायाच्या पोटरीला खोबणी पडण्याचा दोष निर्माण झाला, ते दोष म्हणजे त्या जन्मातील त्याच्या त्या कुकर्माबद्दल या जन्मात त्याला मिळालेली शिक्षा समजली तर या जन्मात त्याला स्त्रीजन्म मिळणे हीसुद्धा त्याबद्दलची एक शिक्षाच मानता येईल, असे स्टिव्हेन्सन यानी म्हटले आहे. मा खिन् माग्यी व मा खिन् मान् गे या भिन्न स्वरूपाच्या व भिन्न स्वभावाच्या मुली होत्या, पण मागच्या जन्मातील उ माउंग माउंग (पती) व दाव अये ह्ला (पत्नी) यांच्याशी त्यांचे पूर्ण साम्य असल्याचे आढळून येते. हे करण्यासाठी त्यांची मागच्या जन्मातील व्यक्तिमत्वे कशी होती हे पाहणे जरूरीचे आहे.

उ माउंग माउंग हा मूळचा भारतीय होता. ( ब्रह्मदेशातील भारतीय बहुधा स्वतस्नाठी ब्रह्मदेशीय नावे धारण करतात) त्याचा बाप बौद्ध होता, तो उ माउंग माउंग ला त्याची पत्नी गरोदर असतानाच वारला. तिने लगेच एका मुस्लिमाशी लग्न केले. त्यामुळे जन्माने बौद्ध असलेला उ माउंग माउंग मुस्लिम म्हणून वाढला. त्याने शिक्षण पूर्ण केल्यानंतर सरकारी नोकरी धरली. बौद्धधर्मीय दाव अये ह्लाशी त्याने नंतर लग्न

केले. त्यांना दोन मुले झाली. पहिला "मुलगा वारला. दुसरी मुलगी म्हणजे वरील जुळ्याची आई दाव म्या तिन् होय. उ माउंग माउंग हा अत्यंत प्रामाणिक आणि सचोटीने वागणारा मनुष्य होता. तो आपली स्तुती करणाऱ्याला वश होत असे व त्यांना मदत करीत असे. तो एक उत्तम यंत्रविशारद होता. घडयाळे, एंजिन, मोटारी दुरूस्त करीत असे. दाव अये ह् ला हिच्याशी त्याचा संसार सुखाचा होता, दाव अये ह् ला ही अधिकार गाजवणारी बाई होती. उलट उ माउंग माऊंग हा दुसऱ्याच्या इच्छेप्रमाणे व नमते घेऊन वागण्याच्या स्वभावाचा होता. त्यामुळे स्वाभाविकच तो पत्नी दाव अये ह् ला हिच्या कह्यात असे. पण एका बाबतीत त्या दोघात मतभेद होता. तो बंदुकीने पक्ष्यांची शिकार करीत असे. तसेच त्याने अंड्यासाठी कोंबड्याही पाळल्या होत्या. (मात्र तो स्वतः अंडी खात नसे) त्या घरच्या आवाराबाहेर जाऊ नयेत म्हणून त्यांच्या पायाला दोरी बांधून ती एका खुंट्याला बांधत असे. अत्यंत धार्मिक वृत्तीच्या त्याच्या बौद्ध पत्नीला त्याची पक्ष्यांची शिकार व प्राण्यांशी निर्दयपणे वागणे पसंत नव्हते. त्यांच्यातील ही एकमेव मतमेदाची बाब वगळता त्यांचा संसार सुखाचा होता. पण ही मतभेदाची दरी त्यांच्या बौध्दधर्मीय चोंबड्या नातेवाइकानी व विशेषत: त्याच्या सासूने तोंडपाटिलकी करून अधिक रुंदावली. त्याची सासू त्याला म्हणू लागली की प्राण्यांच्या हिंसेची मोठी शिक्षा त्याला त्याच्या पुढच्या जन्मी भोगावी लागेल. त्यांच्या सुखी संसारामधील यांच्या नातेवाइकांच्या या लुडबुडीचा असा परिणाम झाला की पतीपत्नीनी काही काळ विभक्त होण्याचा निर्णय घेतला. अर्थात पुन्हा एकत्र येण्याची आशा बाळगून, पण नियतीची इच्छा वेगळी होती. त्यांची या जन्मात, भेट होणार नव्हती. त्यांनी विभक्त होऊन दोन वर्षे झाल्यानंतर त्यांच्या गावापासून ७० कि.मी.वर असलेल्या




Table 4 पांतानाव

प्रांतानाव या गावी उ माउंग माउंग वयाच्या ४४ व्या वर्षी वारला. हा गाव ब्रह्मदेशातून फुटून निघालेल्या बंडखोर कारेण टोळीच्या ताब्यातील प्रदेशात असल्यामुळे त्या भागाचा ब्रह्मदेशाशी फारसा संपर्क नव्हता. त्यामुळे त्याच्या पत्नीला तो मृत्यु पावल्याची बातमी समजली तरी त्याच्या मृत्यूच्या वेळी त्या ठिकाणी जाणे शक्य नव्हते.  मृत्यूच्या एक वर्ष अगोदर उ माऊंग माऊंगला माहित झाले होते की आपला बाप बौद्धधर्मीय होता व आपला जन्म बौद्ध म्हणूनच झाला आहे. जेव्हा त्याची प्रकृती बिघडली व मरणाच्या दारी तो पोहचला तेव्हा पांतानावमधील त्याच्या बौद्ध मित्रांनी त्याला एक जपमाळ दिली. मृत्यूशय्येवर असताना त्याने बौद्ध प्रार्थना म्हणत व जप करत प्राण सोडला. त्याची पत्नी दाव अये ह्ला हिची प्रकृति अतिशय नाजुक होती. तिला थंडी सोसत नसे, तसेच क्षयाची ही तिच्यात लक्षणे होती. कारण खोकताना तोंडातून रक्त पडत असे. पती उ माउंग माउंग याच्या मृत्यूनंतर ती फक्त चार वर्षे जगली, व १९५४ साली मंडालेमध्ये हिवतापाने वारली, दाव आये ह् ला ही निरक्षर होती. पण ती अतिशय धीट स्वभावाची होती. दुसऱ्यावर अधिकार गाजवणारी होती. तथापि ती अत्यंत धार्मिक व कट्टर बौद्ध होती. प्राण्यांची हत्या वा त्यांच्याशी निर्दय वागणूक या गोष्टीला तिचा तीव्र विरोध होता. तिचा पतीशी सुखाचा संसार चालला असताना तिची आई व नातेवाइक यांच्या चोंबडेपणामुळे पतीशी या कारणासाठी

विभक्त होण्याचा तिच्यावर प्रसंग ओढवला. पण त्यांच्यातील परस्पराबद्दलच्या प्रेमाने व आकर्षणाने त्यांना पुनर्जन्मात पुन्हा एकत्र आणले. पण पोटी जुळ्या बहिणी म्हणून आणि तेही आपल्याच मुलीच्या पोटी, जणू पूर्व नियोजनाने, तिच्या गरोदरपणात स्वप्नात येऊन एकत्रितपणे पूर्वसूचना देऊन. जुळ्याची आई दाव म्या तिन् हिने एकदा मा खिन् मान्गो (धाकटी मुलगी? आपल्या या खिन् माग्यी या थोरल्या बहिणीला असे म्हणताना आपण ऐकले. 'तू माउंग माउंग आहेस, मी दाव आये ह् ला आहे. (म्हणजे मागच्या जन्मातील पती-पत्नी असल्याचे तिला म्हणायचे होते.) त्यानी (म्हणजे मागच्या जन्मातील पतीपत्नींनी) दाव म्या तिन् ह्या आपल्या मुलीच्या पोटी घेतलेला असल्यामुळे तिला त्या 'आई' म्हणून बोलवत असल्या तरी इतरांशी बोलताना तिचा उल्लेख माझी मुलगी 'मा म्या तिन्' असा नावाने करीत असत. "दाव म्या तिन् ऐवजी मा म्या तिन् म्हणण्यात ती आपल्यापेक्षा लहान आहे हे त्यांना सुचवायचे असे. आपल्याच कुटुंबात जन्म घेणाऱ्या व्यक्ती आपल्या जन्मदात्रीला 'आई' म्हणण्याऐवजी तिच्या नावाने असे उल्लेख करण्याचा असाच प्रकार इतर पुनर्जन्म प्रकरणातही आढळून येतो.) उल्लेख करणे किंवा हाक मारणेचा ) मागच्या जन्मात पत्नी असलेली मा खिन् मान्गो ही धाकटी बहीण मागच्या जन्मात पती असलेल्या मा खिन माग्यी या आपल्या थोरल्या बहिणीवर, मागच्या जन्माप्रमाणेच, अधिकार गाजवत असे, आणि तो थोरली बहीणही मागच्या जन्मातील पतीप्रमाणे तिच्या कक्षात राहून तिची आज्ञा पाळत असे. तिला भिऊन वागत असे.

## जुळ्या बहिणींच्या आवडीनिवडी, स्वभाव व वागणूक

मागे सांगितले आहे की उ माउंग माउंग हा भारतीय होता, त्याला भारतीय अन्नपदार्थ उदा. पराठा, सामोसा, भारतीय मसाले घातलेली कढी आवडत असे. त्याचा पुनर्जन्म झालेली, व्यक्ती मा खिन् माग्यी हिलाही पराठा, सामोसा, भारतीय कढी आवडत असे, मा खिन् मान्गोला मात्र हे पदार्थ आवडत नसत. उ माउंग माउंग चहा व काफी पीत असे. मा खिन् माग्यी ही चहा आणि कॉफी पीत असे. दाव अये ह् ला ही फक्त चहा पीत असे, काफी पीत नसे. मा खिन माग्यी लहान असतानाच मुलग्याचे (पुरुषी) कपडे वापरण्याचा हट्ट घरी. तिच्या या हट्टापायी तिच्यासाठी खास

मुलग्याचे कपडे तयार करण्यात आले होते. शाळेत मात्र तिला मुलीचे कपडेच वापरावे लागत, तसेच ती मुलीऐवजी नेहमी मुलात मिसळून खेळे. खेळणीच्या दुकानातून मोटारीची खेळणी प्रसंत करी व मोटारीबरोबर खेळे, उलट मा खिन मान्गो मुलींबरोबर बाहुलीशी खेळे. मा खिन माग्यी किडे पकडून त्यांना चिरडून मारत असे. मां खिन् मान्गो उपचार म्हणून नमन करी. पण मा खिन मान्गो त्यांचे मनापासून स्वागत करी व बौद्ध धर्मानुसार त्यांचे सोपस्कार करी. उ माउंग माउंग हा उच्च शिक्षित होता. स्वाभाविकच मा खिन् माग्यीने शाळेत उत्तम प्रगती केली. दाव अये ह् ला ही निरक्षर होती. स्वाभाविकच मा खिन मान्गो शाळेत नेहमी मागासलेली राहिली. ती आपल्या थोरल्या बहिणीप्रमाणे, इतर कुटुंबातील लोकावरही आपली सत्ता गाजवी. तिला कोणी रागे भरले तर ताडपणे त्यांना म्हणे, 'मी दाव अये ह् ला आहे. मला माझ्यावर रागावणे चालणार नाही. मागे सांगितले आहे की उ माउंग माउंग पत्नीशी विभक्त होऊन पांतानावला गेला व तेथेच वारला, मा खिन् माग्यीने पांतानावला जाण्याचा आग्रह धरला होता. तेथे कोळंबी व मासे मिळतात असे ती म्हणे. या जन्मात त्या जुळ्याला पांतानावला नेले नव्हते ही गोष्ट येथे उल्लेखनीय आहे. त्या जुळ्याला इतर लहानमोठे पाच भावंडे होती, पण त्यांच्यापेक्षा त्या जुळ्याचे परस्पराबद्दल जास्त प्रेम होते. काही वर्षानंतर त्यांचे कुटुंब रंगूनमध्ये राहावयास केले. तिथे मा खिन् मान्यीने कोंबड्या पाळण्याची आपली इच्छा व्यक्त केली, पण "रंगूनमध्ये हे शक्य नव्हते.

## गरोदर दाव म्या तिन् चे डोहाळे

मान्गो असे काही करीत नसे. घरी आलेल्या बौद्ध भिक्षूना मा खिन् माग्यी केवळ गरोदर असताना दाव म्या तिच्या अन्नाच्या आवडी सतत बदलत असल्याने तिला आढळून आले. कधी तिला कॉफी पिण्याची इच्छा होई; तर कधी चहा पिण्याची इच्छा होई. या दोन्ही इच्छामधील धरसोड वृत्ती तिच्या त्या त्या इच्छेच्या तीव्रतेवर अवलंबून असल्याचे दिसून येई. एरवी ती दोन्ही सारख्याच्या इच्छेने पीत असे. पण त्या त्या इच्छेच्या तीव्रतेतील बदल ती ज्यांना गरोदर होती त्या तिच्या आईबापांच्या इच्छांमुळे घडत होता हे उघड होते. कारण तिचा बाप उ माउंग माउंग हा चहा व काफी दोन्ही पीत असे. पण तिची आई दाव अये ह् ला ही फक्त चहा पीत असे,

काफी पीत नसे, पुढे जुळ्याच्या या विषयीच्या सवयी सुद्धा त्यानुसारच आढळून आल्याचे आपण वर पाहिलेच आहे. तसेच आपण मागे पाहिले आहे की उ माउंग माउंग हा भारतीय होता व त्याला पराठा, सामोसा हे भारतीय पदार्थ आवडत असत आणि त्याचा पुनर्जन्म झालेल्या व्यक्तीला मा खिन् माग्यीलाही हेच पदार्थ आवडत असत. दाव म्या तिन् लाही गरोदरपणी पराठा खाण्याची तीव्र इच्छा होई व ते खाण्यासाठी भारतीय उपहारगृहाला ती खास भेट देत असे, असे आढळून आले आहे.

## प्रस्तुत प्रकरणातील कार्मिक संबंध: कर्मसिध्दांताची चर्चा

स्टिव्हन्सननी तपासलेल्या सुमारे अडीच हजार पुनर्जन्म प्रकरणापैकी केवळ चार प्रकरणातच त्यांना कार्मिक संबंध आढळून आलेला असल्यामुळे (ज्यापैकी त्यांनी स्वतच्च म्हटल्याप्रमाणे प्रस्तुत जुळ्याचे व मागच्या प्रकरणातील विजेरत्नाचे अशी दोनच प्रकरणे त्यांनी विस्ताराने प्रसिद्ध केली आहेत) इतक्या अल्प संख्येच्या प्रकरणांच्या आधारे कर्माविषयी तार्किक विचार करणे धोक्याचे आहे असे त्यांनी म्हटले आहे. असे असले तरी कर्माविषयी तार्किक विचार मांडण्याचा मोह त्याना आवरता आलेला नाही. त्याचे कारण असे दिसते की त्यांची बहुतेक अशी खात्री झालेली आहे की माणसाच्या मृत्यूपूर्वीच्या मनातील केवल विचारामुळेच त्याच्या पुढील जन्मातील शरीरात विशिष्ट प्रकारचे जन्मजात दोष वा जखमा निर्माण होतात. त्या व्यक्तीने केलेल्या (वाईट) कर्मामुळे ते निर्माण होत नाहीत, उदाहरणार्थ प्रस्तुत प्रकरणात मा खिन् माग्यीच्या एका हाताला बोटे नसण्याचा व एका पायाच्या पोटरील गोल खोबणी असण्याचा, असे जे दोन जन्मदोष निर्माण झाल्याचे दिसतात, ते तिच्या मागच्या जन्मातील उ माउंग माउंग याने अनुक्रमे बंदुकीने पक्ष्यांची शिकार केल्यामुळे व कोंबड्यांचे पाय दोरीने बांधल्यामुळे निर्माण आलेले असावेत असे वाटत असले तरी वास्तविक त्याच्या त्या वाईट कर्माचे परिणाम म्हणून ते जन्मदोष निर्माण झालेले नसून त्याच्या मृत्यूपूर्वीच्या बौद्ध धर्मातील कर्मसिद्धांताविषयीच्या शिकवणुकीच्या (मनातील) विचारामुळे ते निर्माण झाले आहेत असा आपला तार्किक विचार स्टिव्हेन्सनननी मांडला आहे. तात्पर्य, स्टिव्हेन्सन यांचा कर्माविषयीचा तार्किक विचार (त्याला ते कर्मसिद्धांत म्हणत नाहीत) असा की माणसाच्या एका जन्मातील चांगल्या-

वाइट कर्माचा त्याच्या दुसऱ्या जन्मातील परिस्थितीशी काही संबंध नसून त्याच्या मृत्यूपूर्वीच्या विचाराशी संबंध आहे. त्यानी आपल्या या तार्किक विचाराची पुष्टी पुढील घटनेच्या आधारे केली आहे. उ माउंग माउंग पांतानाव या गावी मृत्यूशय्येवर असताना तेथील त्याच्या बौद्ध मित्रांनी त्याला एक जपमाळ दिली. ती त्याने स्वीकारली याचे कारण तत्पूर्वी आपण जन्माने बौद्ध असल्याचे त्याला माहित झाले होते. व आपली सासू पक्ष्यांची शिकार करण्याचे वाईट परिणाम तुला पुढच्या जन्मी भोगावे लागतील असे जे वारंवार त्याला म्हणत होती त्या बद्दलच्या बौद्धधर्मातील कर्मसिद्धांताच्या विचाराचा परिणाम त्याच्या मनावर झाला होता. त्या विचारामुळे त्याच्या पुढील (मा खिन् माग्यीच्या) जन्मातील शरीरात उपरोक्त विशिष्ट प्रकारचे जन्मदोष निर्माण झाले, याचा अर्थ असा की त्याला आपण बौद्ध असल्याचे माहित झाले नसते तर त्याच्या मनावर त्याच्या सासूच्या म्हणण्याचा व परिणामी बौद्ध धर्मातील कर्मसिद्धांताच्या विचाराचा परिणाम झाला नसता व त्याच्या पुढील जन्मात उपरोक्त जे जन्मदोष निर्माण झाले, ते निर्माण झाले नसते. तात्पर्य, माणसाच्या पुढील जन्मात जे परिणाम होतात ते त्याच्या मृत्यूपूर्वीच्या विचारामुळे होतात. त्या विचाराचे फळ मिळते; चांगल्या-वाईट कर्माचे फळ मिळत नाही, त्याचे परिणाम होत नाहीत, असा कर्माविषयीचा विचार स्टिव्हेन्सननी येथे मांडलेला दिसतो.

आता त्यांचा कर्माविषयीचा हा विचार बरोबर असेल तर त्यांनी स्वतच्च ज्या प्रकरणाला कार्मिक प्रकरण म्हटले आहे व ज्याचा आपण १२ व्या प्रकरणात विस्ताराने विचार केला आहे, त्या विजेरत्नेच्या प्रकरणालाही कर्माविषयीचे त्यांचे हे विचार लागू व्हावयास हवेत, पण ते लागू होताना दिसत नाहीत. कारण मृत्यूपूर्वी विजेरत्नेचे पूर्व जन्मातील जे व्यक्तिमत्व रत्राण हामी, त्या व्यक्तिमत्त्वाचा फाशीला जाण्यापूर्वीचा विचार कार्मिक नव्हता. म्हणजे आपल्या (वाईट) कर्माच्या परिणामाचा (फलनिष्पत्तीविषयीचा) विचार याने (रत्राण हामीने) केला नव्हता. रत्राण हामीने तिलेरत्ने या आपल्या थोरल्या भावाला 'मी तुझा मुलगा म्हणून परत येईन' असे फाशी जाण्यापूर्वी म्हटले होते. म्हणजे त्याचा मृत्यूपूर्वीचा मनातील विचार पुढे कुठे जन्म घ्यावयाचा या बद्दलचा फक्त होता. आपल्या पत्नीचा खून केल्याबद्दलच्या

कार्मिक परिणामाचा विचार त्याने मुळीच केलेला नव्हता, तो त्याने केलेला असता तर त्याची माहिती त्याच्या प्रकरणात स्टिव्हेन्सननी अवश्य दिली असली, त्याने आपल्या शारीरिक जन्मदोषांचा (उदा. एक सुकलेला हात, त्या हाताची खुजी चिकटलेली बोटे, छातीतील खोलगट भाग या जन्मदोषांचा) जो कार्मिक संबंध मागच्या जन्मातील (रत्राण हामी म्हणून) त्याने केलेल्या आपल्या पत्नीच्या खुनाशी जोडला, तो त्याचा पुनर्जन्म झाल्यानंतर. म्हणजे कार्मिक संबंध 'हा त्यांच्या मनातील पश्चात विचार होता, तो त्याच्या मागच्या जन्मातील त्याच्या मनातील मृत्यूपूर्वीचा विचार नव्हता, जो स्टिव्हेन्सन यांचा कर्माविषयीचा विचार बरोबर असेल तर अवश्य असावयास हवा होता.

## आणखी दोन कार्मिक प्रकरणे

दुसऱ्या एका ठिकाणी स्टिव्हेन्सननी कर्म सिद्धांताविषयी विचार करताना बिशनचंद्र कपूर व राणी सक्सेना यांची प्रकरणेही कार्मिक (retributive) असल्याचे म्हटले आहे. (स्टिव्हेन्सन कर्माचा विचार retributive म्हणजे शिक्षेच्या स्वरूपातूनच नेहमी करताना दिसतात.) बिशनचंदचे प्रकरण आपण ७ व्या प्रकरणात विस्ताराने पाहिले आहे व राणी सक्सेनाचे प्रकरण मागच्या १२ व्या प्रकरणात संक्षिप्तात पाहिले आहे. बिशनचंद कपूर हा मागच्या जन्मात लक्ष्मीनारायण म्हणून एका मोठया जमिनदाराच्या अत्यंत श्रीमंत कुटुंबात जन्मला होता. त्याने त्या जन्मात आपल्या रखेलीच्या खोलीतून बाहेर येत असलेल्या एका माणसाला पाहून त्याचा बंदुकीने खून केला होता, ज्याची स्मृती त्याच्या पुढील (बिशनचंदच्या) जन्मात प्रौढपणीसुद्धा ताजी होती. आपला (बिशनचंद म्हणून) अत्यंत गरीब कुटुंबात जो जन्म झाला तो आपल्या मागच्या (लक्ष्मीनारायणाच्या) जन्मातील श्रीमंतीपणाच्या वागणुकीमुळे व (त्याच्या जोरावर) त्या माणसाचा खून केल्यामुळे असे तो मानत होता, असे स्टिव्हेन्सन यांनी म्हटले आहे. म्हणजे बिशनचंदने आपल्या चालू जन्मातील परिस्थितीचा आपल्या मागच्या जन्मातील परिस्थितीशी जो कार्मिक संबंध जोडला तो आपला पुनर्जन्म झाल्यानंतर मागच्या जन्मातील लक्ष्मीनारायणाचा तो

मृत्यूपूर्वीचा विचार नव्हता, जो स्टिव्हेन्सन यांच्या कर्माविषयीच्या कल्पनेनुसार असणे आवश्यक होते.

दुसरे राणी सक्सेनाचे जे उदाहरण त्यांनी दिले आहे तेही अशाच प्रकाराचे आहे. मागच्या जन्मात आपण श्रीमंत वकील (पुरुष) होतो व स्त्रियांचे शोषण केले होते. त्याचा परिणाम (retribution = शिक्षा) म्हणून आपणाला स्त्रीजन्म मिळाला व गरीब कुटुंबात (मुले बाळंत होऊन त्यांना सांभाळण्याचे) जीवन कंठावे लागले, असे तिने जे म्हटले आहे, ते आपला पुनर्जन्म झाल्यानंतर. मागच्या जन्मातील वकीलाचा तो मृत्यूपूर्वीचा विचार नव्हता, जो स्टिव्हेन्सन यांच्या कर्माविषयीच्या विचारांनुसार असणे जरूर होते.

## कार्मिक जन्मदोषांच्या निर्मितीचा प्रश्न

दुसरा सर्वात महत्वाचा प्रश्न असा की मा खिन् माग्यीच्या एका हाताला बोटे नसण्याचा व त्यांच्या जखमी भागातून पू गळण्याचा, तसेच एका पायाच्या पोटरीला गोल खोबणी असण्याचा, असे जे दोन जन्मतच्च दोष निर्माण झाले होते ते कशामुळे? ते काही उ माउंग माउंग याच्या मनातील मृत्यूपूर्वीचे विचार खासच नव्हते. तसेच विजेरत्नेच्या उजल्या छातीला बरगडी नसल्यामुळे छातीत खोलगट भाग निर्माण होणे व उजव्या हाताची बोटे खुजी बनून ती एकमेकांना चिकटणे व संपूर्ण उजवा हात सुकणे, असे जे दोन मोठे जन्मदोष विजरत्नेच्या शरीरात निर्माण झाले ते कशामुळे? त्या दोषांचे विचार रत्राण हामीच्या (विजरत्नेच्या पूर्वजन्मातील व्यक्तीच्या) मनात मृत्यूपूर्वी असल्याचे आढळून आलेले नाही, कोणताही जन्मदोष त्या व्यक्तीच्या मृत्यूपूर्वीच्या विचारामुळे निर्माण होतो, त्याच्या कुकर्मामुळे निर्माण होत नाही हा स्टिव्हेन्सन यांचा कर्माविषयीचा विचार बरोबर असेल तर उपरोक्त जन्मदोष उ माउंग माउंग व विजरत्ने यांच्या मनात त्यांच्या मृत्यूपूर्वी अवश्य असावयास हवे होते. पण ते असल्याचे आढळून आलेले नाही. मग ते दोष कसे निर्माण झाले? कर्म सिद्धांताविषयीचा हा  अत्यंत महत्वाचा प्रश्न असून त्याचे समाधानकारक उत्तर द्यावयास पाहिजे. तसेच उ माउंग माउंग या पुरुषाचे पुढील जन्मात (मा खिन् माग्यीच्या रूपाने) जे स्त्रीमध्ये लिंगांतर झाले ते कशामुळे? स्त्रीमध्ये लिंगबदलाचा

विचार उ माउंग माउंग याच्या मनात मृत्यूपूर्वी निश्चित नव्हता. उलट मा खिन् माग्यीच्या (त्याच्या पुढील जन्माच्या व्यक्तीमत्वाच्या) पुरुषी कपडे वापरण्याच्या हट्टावरून व मुलात मिसळून खेळण्यावरून स्त्रीलिंगामध्ये बदल होणे हे उ माउंग माउंगच्या इच्छेविरुद्ध असल्याचे दिसते. तो विचार मनात असणे तर दूरच. या सर्व प्रश्नांचे उत्तर भौतिक कार्यकारणभावात (जनुकात) तर मिळत नाहीच, पण मानसिक कार्यकारणभावातही (मनातील मृत्यूपूर्वीच्या विचारातही) मिळत नाही. त्यामुळे त्याचा विचारच स्टिव्हेन्सननी केलेला नाही, तो न करण्याचे कारण तो रूढ विज्ञानाच्या कार्यकारण भावाच्या कक्षेबाहेरच विषय आहे. आध्यात्मिक कक्षेतील तो विषय आहे, ज्या क्षेत्राशी दुरान्वयानेही कार्मिक संबंध असल्याचा संशय सुदा स्टिव्हेन्सन यांच्या मनात नाही. ही गोष्ट त्यांनी मांडलेल्या कर्माविषयीच्या खालील विचारावरून स्पष्ट होते.

## रूढ विज्ञानाच्या दृष्टीतून कर्माविषयीचे स्टिन्हेन्सनचे विचार

कर्माविषयी स्टिव्हन्सन म्हणतात, "In the scriptures and commentaries of Hindu and Buddhism, the word (karma) refers to an axiom, not to a theory that we could test by the methods of science. Nos do I think that attributing to karma every difference between the lives of personalities linked in a case offers any advance over passing responsibilities back to God. Both explanations can furnish a lazy man with a hose to extinguish the flame of curiosity about particular differences" (Cases of Reincarnation Type Vol. III P. 186-7, F.N.) याचा अर्थ असा:" कर्म हे एक गृहितकृत्य **(आधारविना खरी आहे अशी मानलेली गोष्ट)** आहे, तो काही सिद्धांत नाही की ज्याची विज्ञानाच्या पद्धतीने तपासणी करता येईल. एखाद्या व्यक्तीच्या दोन जन्मातील (परिस्थितीतील) फरक कर्मामुळे निर्माण होतो (म्हणजे एका जन्मातील माणसाचे कर्म पुढच्या जन्मातील परिस्थिती निर्माण करते) असे म्हणतो काय, आणि तो फरक (परिस्थिती) ईश्वर निर्माण करतो असे म्हणणे काय,

दोन्ही सारखेच. माणसाच्या दोन जन्मातील (परिस्थितीतील) फरकाबद्दलच्या 'कर्म' आणि 'ईश्वर' या दोन्ही उपपत्त्या आळशी माणसाचे कुतूहल शमविणाऱ्या उपपत्या[ म्हणजे खोट्या उपपत्या] आहेत."

या उताऱ्यात दोन मुख्य मुद्दे आहेत. पहिला मुद्दा: कर्माची (रूढ) विज्ञानाच्या पद्धतीने तपासणी करता येत नाही. दुसरा मुद्दा: माणसाच्या दोन जन्मांच्या परिस्थितीतला फरक कर्मामुळे निर्माण होतो असे म्हणणे काय व तो फरक ईश्वरामुळे निर्माण होते असे म्हणणे काय, दोन्ही सारखेच असून 'कर्म' व "'ईश्वर' ह्या दोन्ही उपपत्या आळशी माणसाचे कुतूहल शमविणाऱ्या आहेत. म्हणजे त्या खऱ्या उपपत्या नाहीत. गंमत अशी की स्टिव्हेन्सन यांचा (कर्माची विज्ञानाच्या पद्धतीने तपासणी करता येत नाही हा) पहिला मुद्दा खरा असल्यामुळे त्यांचा ('कर्म' व 'ईश्वर' ह्या दोन्ही उपपत्या खऱ्या नाहीत, हा) दुसरा मुद्दा खोटा ठरतो. म्हणजे कर्माची (रुढ) विज्ञानाच्या पद्धतीने तपासणी करता येता नसल्यामुळेच ''कर्म व 'ईश्वर' ह्या दोन्ही उपपत्या खऱ्या ठरतात. कारण प्रश्न 'असा की 'कर्मा'ची विज्ञानाच्या पद्धतीने तपासणी करता येत नसताना 'कर्म' व 'ईश्वर' ह्या दोन्ही उपपत्या खऱ्या नाहीत हे स्टिन्हेन्सनना कसे कळले? उलट <u>'कर्म' व 'ईश्वर' ह्या दोन्ही उपपत्या आध्यात्मिक असल्यामुळेच 'कर्मा' ची रूढ विज्ञानाच्या पद्धतीने तपासणी करता येत नाही व म्हणून त्याची खरी उपपत्ती देता येत नाही.</u> त्यामुळे स्टिन्हेन्सन यांना 'कर्मा'ची खरी उपपत्ती कळलेली नाही. आणि ती कळलेली नसल्यामुळे माणसाच्या दोन जन्मांच्या परिस्थितीमधील फरक कसा-कुणाच्या कर्मामुळे-निर्माण होतो हे त्यांनी सांगितले नाही. कारण हे त्यांना रूढविज्ञानाच्या कार्यकारणभावाने तपासणी करून सांगता येत नाही. म्हणून तो प्रश्नच त्यांनी टाळला आहे. जेथे त्याचे उत्तर देण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे तेथे तो अयशस्वी ठरला आहे. उदा. ११ व्या प्रकरणात आपण विस्ताराने पाहिले आहे की एखाद्या व्यक्तीच्या एका जन्मात तिच्या खुनाने वा अपघातामुळे झालेल्या मृत्यूच्या वेळी तिच्या शरीराला झालेल्या जखमांच्या खुणा किंवा तिच्या प्रेताला अपघाताने वा प्रेमाबद्दलच्या निष्काळजीपणामुळे झालेल्या जखमांच्या खुणा किंवा कृत्रिमपणे इतरांनी प्रेतावर केलेल्या (रंगित) खुणा तिच्या पुनर्जन्मातील

शरीरावर कशा निर्माण होतात, या सर्व प्रश्नांचे उत्तर रूढ विज्ञानाच्या पद्धतीने समाधानकारकरीत्या स्टिव्हेन्सनना देता आलेले नाही. ते उत्तर ब्रह्मविज्ञानाच्या पद्धतीने कसे देता येते हे आपण त्या प्रकरणात विस्ताराने पाहिले आहे. तात्पर्य, माणसाच्या एका जन्मातून त्याच्या दुसऱ्या जन्मातील शरीरावरील जखमांच्या खुणांची निर्मिती ही माणसाच्या कर्मामुळे होत नसून ते ब्रह्माचे, ईश्वराचे, निर्मिती कर्म आहे - आणि जी गोष्ट माणसाच्या दोन जन्मातील शरीरावरील जखमांच्या खुणांच्या निर्मितिविषयी खरी आहे, तीच गोष्ट त्याच्या दोन जन्मातील (भौतिक) परिस्थितिच्या (फरकाच्या) निर्मितीच्या बाबतीतही खरी आहे. म्हणजे माणसाच्या दोन जन्मातील (भौतिक) परिस्थितीमधील फरकाची निर्मिती ही देखील माणसाच्या कर्मामुळे होत नसून ते ब्रह्माचे, ईश्वराचेच निर्मिती कर्म आहे. मात्र येथे हे लक्षात ठेवले पाहिजे की वरील उताऱ्यात स्टिन्हेन्सननी 'कर्म' व 'ईश्वर' अशा ज्या दोन वेगवेगळ्या उपपत्या दोन मानल्या आहेत. त्या दोन उपपत्या वेगळ्या नसून 'ईश्वर' ही एकच उपपत्ती मुळातील उपपत्ती आहे. कारण कर्म हे मुळात ब्रह्मापासून, ईश्वरापासून निर्माण झाले आहे. (कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि । गीता २.१५) आणि ब्रह्मापासून निर्माण झालेले कर्म म्हणजे पंचभौतिक विश्व व त्यातील माणसासह सर्व जीवांची उत्पत्ती होय. (भूतभावोद्भवकर: निसर्गःकर्मसंज्ञितः। गीता. ८.३)

आणि त्या कर्मात ब्रह्मपासून निर्माण झालेल्या माणसाच्या कर्माचाही समावेश होतो. त्या कर्माचे फळ त्याला कुठे द्यावयाचे, केंव्हा द्यावयाचे, कशा स्वरूपात द्यावयाचे किंवा द्यावयाचे की नाही, ह्या सर्व गोष्टी (एका जन्मातील जखमांच्या खुणा दुसऱ्या जन्मातील शरीरावर कुठे निर्माण करावयाच्या, केव्हा व कशा स्वरूपात निर्माण करावयाच्या किंवा त्या निर्माण करावयाच्या की नाही ह्या सर्व गोष्टीप्रमाणेच) ईश्वराधीन, ब्रह्माधीन शरण आहेत, त्यामुळे कोणत्याही व्यक्तीच्या दोन जन्माखेरीज अधिक जन्मांची प्रकरणे न तपासलेल्या स्टिन्टेन्सनना कोणत्याही व्यक्तीच्या कुकर्माच्या शिक्षेच्या (retributive) स्वरूपातील परिणाम त्या व्यक्तीच्या सलगच्या दोन जन्मात आढळून न यावा यात आश्चर्य नाही. कारण कर्माचा परिणाम सलगच्या जन्मात व्हावा असा नाही नियम नाही. असा (शिक्षेच्या स्वरूपातील) परिणाम

आपल्याला सलगच्या दोन जन्मात आढळून आलेला नाही या गोष्टीची स्टिव्हेन्सननी आवर्जून नोंदी ही केलेली आहे. ती नोंद करून स्टिव्हेन्सन कर्माविषयी अन्यत्र एका ठिकाणी चर्चा करताना म्हणतात: Although the cases provide no evidence for a process like retributive karma, this does not mean that conduct in one life cannot have effects in another. Such effects, however, would not occur externally in material conditions of successive lives, but internally in the joys and sorrows experienced. In this respect and alone, I think the cases provide hope for improvement in ourselves from one life to another' (Children Who Remember their Past Lives- Ian Stevenson, 1987, p.259) याचा अर्थ असा : "एका जन्मातील कर्माचे परिणाम पुढील जन्मात शिक्षेच्या रूपात होत असल्याबद्दलचा पुरावा पुनर्जन्म प्रकरणात मिळत नसला तरी, एका जन्मातील वर्तणुकीचे परिणाम पुढील जन्मात होत नाहीत असा याचा अर्थ नाही, हे परिणाम बाह्य भौतिक परिस्थितीच्या स्वरुपात नसतील, पण आंतरिक सुखदुःखाच्या, अनुभवाच्या स्वरूपातील असतील, आणि माझ्या मते केवळ "याच बाबतीत एका जन्मातून दुसऱ्या जन्मात आमच्यात काही सुधारणा होण्याची आशा आहे"

## माणसाच्या आध्यात्मिक उत्क्रांतिसाठी भौतिकाची आवश्यकता

कर्माचा उद्देश बाह्य भौतिक परिस्थितीमधील सुधारणा हा नसून आंतरिक सुधारणा हा आहे, हे नि:संशय खरे आहे आणि ही आंतरिक सुधारणा सुखदुःखाच्या आंतरिक अनुभवातूनच होते हेही तितकेच निःसंशय खरे आहे. तथापि कर्म "सिद्धांतामध्ये बाह्य भौतिक परिस्थितीला महत्व नसल्याचे स्टिन्टेन्सन यांनी येथे जे सुचविले आहे ते खरे नाही. उलट बाह्य भौतिक परिस्थितीलाच सर्वात जास्त महत्व आहे. कारण बाह्य भौतिक परिस्थिती नसेल तर मनुष्याला आंतरिक सुखदुःखाचा अनुभवच घेता येणार नाही. मनुष्याला सुखदुःखाचा अनुभव पोकळीतून मिळत नाही. बाह्य भौतिक परिस्थितीतूनच तो मिळतो, खरे तर हे बाह्य भौतिक जग का निर्माण

झाले आहे? माणसाला भौतिक शरीर कशासाठी मिळाले आहे? हा महत्वाचा प्रश्न असून त्याचे उत्तर हेच की या बाह्य भौतिक जगातून व आपल्या भौतिक शरीराच्या माध्यमातून माणसाने टक्केटोणपे खाऊन आंतरिक सुखदुःखाचा अनुभव घ्यावा व स्वतःची आत्मोन्नती, आध्यात्मिक प्रगती साधावी, या खेरीज या बाह्य भौतिक जगाचे व मानवी भौतिक शरीराचे दुसरे कोणतेच प्रयोजन असू शकल नाही. आता महत्वाचा प्रश्न निर्माण होतो तो हा की या बाह्य भौतिक जगाचा व माणसाच्या भौतिक शरीराचा कर्ता कोण? हे कुणाचे कर्म? अर्थात् वर स्पष्ट केले आहे की ब्रह्म, ईश्वर हाच यांचा कर्ता आहे, हे त्याचेच कर्म आहे, स्वतः भौतिक विज्ञानातील क्वांटम मेकॅनिक्सच्या सिद्धांतातूनच या मूळ आध्यात्मिक सत्याचे समर्थन होत असल्याचे आपण या पूर्वी विस्ताराने पाहिले आहे. (प्रकरण २ पाहा) अशा या भौतिक जगाच्या-संसाराच्या-उत्पत्तीचे, (ज्यात मानवाच्या भौतिक शरीराच्या उत्पत्तीचाही समावेश होतो) प्रयोजन मानवाला त्यातून मिळणाऱ्या आघातातून त्याची आध्यात्मिक उत्क्रांती व्हावी, हेच आहे. "विपदः सन्तु नःशश्वत् मासु संस्मर्यते हरिः' 'हे महाभारतातील कुंतीचे वचन याचेच प्रत्यंतर देते.) ही ईश्वर- नियोजित आध्यात्मिक उत्क्रांती पुनर्जन्मातूनच शक्य आहे व साध्य होते आणि पुनर्जन्म माणसाच्या कर्मामुळेच त्याला मिळतो, कर्माशिवाय पुनर्जन्म शक्य नाही आणि पुनर्जन्माशिवाय मानवाची आध्यात्मिक उत्क्रांती शक्य नाही. योगी अरविंदानी Rebirth and Evolution (पुनर्जन्म आणि उत्क्रांती) या ग्रंथात हे सर्व स्पष्टपणे आणि विस्ताराने सांगितले आहे. येथे फक्त आपल्याला हे दाखवून द्यायचे आहे की भौतिक जगाची-संसाराची-उत्पत्ती, कर्म, पुनर्जन्म, हे सर्व मानवाच्या आध्यात्मिक उत्क्रांतिसाठी ईश्वराने रचलेले एक नाटक आहे. (प्रकरण ३ पाहा) तोच हे नाटक भौतिक विश्वाच्या रंगमंचावर असंख्य जीवांना व मानवाच्या रूपांनी खेळत आहे. तोच या विश्वरूपी नाटकातील सर्व चांगल्या व वाईट कर्माचा कर्ता आहे. ('चांगले' व 'वाईट' या दोन्हींची मानवाच्या उत्क्रांतीसाठी गरज आहे, हे येथे लक्षात ठेवावे. या दोन्ही झगड्याशिवाय मानवाची आध्यात्मिक उत्क्रांती शक्य नाही.) म्हणून या नाटकातील सुष्ट व दुष्ट ही दोन्ही पात्रे ईश्वरच वठवीत आहे, अशा रीतीने या भौतिक जगात जे

काही चालले आहे ते सर्व काही तोच आहे. ही गोष्ट संत तुकारामांच्या शब्दात सांगावयाची झाल्यास-

चाले हे शरीर कोणा चिये सत्ते। कोण बोलविते हरी विण ॥ १।। देखवी ऐकवी एक नारायण। तयाचे भजन चुको नको ।।2।। मानसाची (मनाची) देव चालवी अहंता । मीचि एक कर्ता म्हणो नये ॥ ३ ॥ वृक्षाचेही पान हाले त्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठे |।४|। तुका म्हणे विठो भरला सबाह्य। उणे काय आहे चराचरी ।।५।।

संपूर्ण चराचर विश्वात ईश्वर, ब्रह्म सबाह्यांतरी भरलेला असल्याने त्यातून- त्यातील कोणत्याही गोष्टीतून- त्याला, कोणीही 'उणे' करू शकत नाही, हा पुनर्जन्म व कर्म- सिद्धांताचा (तुकारामांच्या शब्दातून दिलेला) संदेश आहे. मात्र स्टिव्हेन्सननी पुनर्जन्म आणि कर्म यातून ईश्वराला, ब्रह्याला 'उणे' केल्यामुळे त्यांच्या दृष्टीने कर्म हा सिद्धांत न ठरता केवळ एक गृहितकृत्य ठरले. पण कर्म हे गृहितकृत्य (**आधारविना खरी आहे अशी मानलेली गोष्ट)** नसून तो सिद्धांत तर आहेच, पण वास्ताविक तो (कर्मसिद्धांत) मुळात ब्रह्मसिद्धांत-ईश्वरसिध्द्धांतच- आहे, हे आता स्पष्ट होईल. (कर्म ब्रह्मोदनं विद्धि।)

**बेळगावी जिल्हा कन्नडसाहित्य परिषद**

**तालुका घटक निपाणी**

**निपाणी तालुका तिसरे कन्नड साहित्य संम्मेलन,**

**भोज**

**रविवार ११ डिसेंबर २०२२**

**स्थळ :**

**प्रथमाचार्य श्री शांतीसागर समाधि प्रज्ञासागर सभा मंटप, भोज**

# ❊ सन्मान पत्र ❊



**श्री अद्वयानंद गळतगे**

साहित्यिक

संम्मेलनाध्यक्ष

सन्माननीय,

शिवभक्त असणारे आपण बेळगावी जिल्ह्यातील निपाणी तालुक्यामधील पुण्यभूमी भोज गावच्या सुसंस्कृत घराण्यातील शिवभक्त दांपत्य श्री. राघोबा व सौ गंगुबाई उदरी दि. ०६-०८-१९३२ साली जन्मला.

स्वत:च्या गावी कन्नड माध्यामात प्राथमिक शिक्षण, निपाणीत (प्रौढ) माध्यमिक शिक्षण घेतला आहात. उच्चशिक्षण कोल्हापूर व पुण्यात बी. ए. (ऑनर्स) पदवी प्राप्त करुन पुणे विद्यापीठातून श्री दांडेकर स्कॉलरशीप मिळवून इतिहास विषयात पदव्युत्तर पदवी उच्च श्रेणीत पूर्ण केलात. त्यानंतर आपण कारदम्यातील प्रसिद्ध शिक्षण संस्था- श्री डी. एस. नाडगे संस्थेच्या माध्यमिक शाळेत अध्यापक म्हणून सेवा करुन 'आदर्श शिक्षक' म्हणून विद्यार्थ्यांचे आवडते शिक्षक म्हणून लोकप्रिय झालात. प्रतिष्ठित शिक्षण संस्था श्री डी. एस. नाडगे संस्थेचे संयुक्त पदवीपूर्व महाविद्यालय सुरु करुन ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांना शिक्षणाची संधी उपलब्ध करुन दिलात. पांच भाषेत निष्णात असलेले आपण वैशिष्ट्यपूर्ण अध्यापनाने सर्वांची मनं आकर्षित करुन प्रिय झालात.

आपण आपली अमोघ सेवा संस्था आणि विद्यार्थी, शिक्षक, कर्मचारी, पालक या सर्वांना आवडेल असा कार्यकाल पार पाडला आहात.

वृत्तीने अध्यापक असून प्रवृत्तीने साहित्यिक होऊन, उत्तम वक्ते असणारे आपण आध्यात्मिक चिंतक होऊन अनेक व्याख्याने दिल्यामुळे समाजातील अंधश्रद्धा, पुनर्जन्म, भानामती अतींद्रिय विज्ञानाबाबत जागृती करुन साहित्य, कृषि, संशोधन इत्यादिमध्ये वाहून घेऊन कर्नाटक- महाराष्ट्र प्रदेशात संचार करुन विशेष जागृती करुन समाजाचे स्वास्थ्य टिकवण्यासाठी प्रामुख्याने भाग घेऊन, ख्याती मिळवून, अनेक पुरस्कार आणि सन्मान यांच्या गौरवास पात्र ठरला.

विज्ञान आणि अंधश्रद्धा निर्मूलन, विज्ञान आणि बुद्धिवाद, विज्ञान आणि चमत्कार, विज्ञानाच्या दृष्टीकोनातून चार्वाकवाद आणि अध्यात्म, डार्विनचा उत्तक्रांतीवाद खरा आहे का? अशा वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथांची रचना करुन देशाला समर्पित केला आहात.

बहुआयामी व्यक्तीमत्त्व आत्मसात करुन आपण आपल्या वैशिष्ट्यपूर्ण, आदर्शपूर्ण सार्थक जीवनाने ९१ व्या उतार वयात सुद्धा नवचैतन्याने कामकाजामध्ये वाहून घेऊन सर्वांना स्फूर्तीदायी आहात.

आपल्या या साधना आणि सेवा ओळखून निपाणी तालुका कन्नड साहित्य परिषद भोज गावात होत असलेल्या कन्नड साहित्य सम्मेलनाचे सर्वाध्यक्षतेचे स्थान देऊन अभिनंदनपूर्वक सन्मान करुन गौरवण्यास अतिशय आनंद वाटतो.

अभिनंदनपूर्वक

**शिवानंद पुराणिकमठ**
कोषाध्यक्ष

**इरण्णा शिरगावी**
अध्यक्ष

**मिथून अंकली**
गौरव कार्यदर्शी

**सौ. सरोजिनी समाजे**
गौरव कार्यदर्शी

आणि सर्व बेळगावी जिल्हा कन्नडसाहित्य परिषद
तालुका घटक निपाणी आणि भोज ग्रामस्थ
निपाणी तालुक्यातील सर्व कन्नड संघटना, कन्नड जनमानस

---

**विशेष कार्य -**

१) १९९० सालामध्ये अलाहाबाद (सध्या प्रयागराज) मध्ये अंतरराष्ट्रीय परिषदेत "डेथ ॲन्ड आफ्टर" प्रबंध वाचन
२) १९९५ सालामध्ये हुबळी येथे अखिल भारतीय पुनर्जन्म परिषदेत पुनर्जन्मावर प्रबंध वाचन
३) सर्व संशोधनांचे प्रयोग केले आहेत.
४) अध्यात्मिक चिंतन आणि उपन्यास
५) मानपत्रात उल्लेख केलेल्या ग्रंथांचे कानडीत अनुवाद झाले आहेत.
६) विज्ञान आणि बुद्धिवाद (विज्ञान पुरस्कार प्राप्त)
७) विज्ञान आणि चमत्कार (संतसाहित्य पुरस्कार)

माननीय सरांच्या ग्रंथांचा इंग्रजीत अनुवाद करण्याबद्दल सर्व सुहृदयांची इच्छा आहे. त्यांना दीर्घायुष्य लाभून अशी सेवा त्यांच्याहातून घडावी ही ईश्वर चरणी प्रार्थना...!



संकेतरेखा नवभारतस्य



# प्रज्ञालोक

(त्रैमासिक)

**चैत्र पौर्णिमा**
**शके १९४२**
**अंक : १**
दि. ०८ एप्रिल २०२०
**(वसंत अंक)**

या वेदस्मृतिशास्त्रविन्मुनिवरैर्जुष्टा सुखैकास्पदं
दैवी संपदलंकृता भगवता श्रीशेन संरक्षिता
या वर्णाश्रमधर्मसारहृदया कामार्थमोक्षप्रदा
नित्या विश्वहितैषिणी जयतु सा श्रीवैदिकी संस्कृतिः

किंमत : ₹ ६०.००/– ● संकेत स्थळ : www.pradnyalok.com

## आर्थिक निवेदन

### आर्थिक निवेदन

कै. प.पू. अप्रबुद्ध व डॉ. ब. स. येरकुंटवार ह्यांच्या आशीर्वादाने चालत असलेल्या 'प्रज्ञालोक'ची आर्थिक बाजू, सुहृदांच्या निधीतून सुदृढ होत आहे. प्रज्ञालोकची वर्गणी खालीलप्रमाणे राहील –

फक्त अंक – रु. ६०/–
वार्षिक वर्गणी – रु. २१०/– त्रैवार्षिक वर्गणी – रु. ६००/–

**–: आर्थिक व्यवहार :–**

नांवे : 'प्रज्ञालोक अभ्यास मण्डळ'
M.O., धनादेश (चेक), बँक अन्तरण (NEFT)
IDBI बँक, धरमपेठ, नागपूर.
बचत खाते क्रमांक : 0543104000071947
IFSC : IBKL0000543/MICR : 440259012

प्रज्ञालोकचे ध्येय धोरण वेळोवेळी संपादकीयातून आलेले आहेच. कै. प. पू. अप्रबुद्धांच्या ग्रंथ व विचारांवर पूर्ण निष्ठा व त्यांचे सखोल चिंतन, मनन करत कै. डॉ. येरकुंटवारांप्रमाणेच नवविज्ञानाची साक्ष व जोड त्याला देत, वैदिक धर्म सेवा नित्य नूतन समाजाचे हातून घडत राहण्यास मार्गदर्शन व वेळोवेळी उत्पन्न होणाऱ्या आचार–संभ्रमांचे

